**“वनसंरक्षण सर्वसाधारण संरक्षण" या योजनेतर योजनेखालील ७९ अस्थायी पदे सन २०२०-२१ मध्ये पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक टिआरएस-०३/२०२०/प्र.क्र.४५/फ-६**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- ३० सप्टेंबर, २०२०.

<u>वाचा</u> :- १) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष ३/योजनेत्तर/प्र.क्र.३९/(१९-२०)/१७८०, दिनांक १८.२.२०२०

२) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र.टिआरएस-०३/२०१९/प्र.क्र.४३/फ-६, दिनांक ३१.३.२०२०

३) शासन निर्णय वित्त विभाग क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि.३१.८.२०२०

**<u>शासन निर्णय</u> :-**

जंगलातील अवैध होणारी चोरटी तूट तसेच बेकायदेशीररित्या वाहतूक करण्यात येणारे जंगल उत्पन्न यावर आळा बसावा तसेच आगीपासून वनांचे संरक्षण व्हावे या उद्देशाने "वनसंरक्षण सर्वसाधारण संरक्षण" या योजनेत्तर योजनेमधील ७९ अस्थायी पदांना दिनांक १.३.२०२० ते दिनांक ३१.८.२०२० पर्यंत संदर्भीय क्र.२ च्या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली होती.

वित्त विभागाने त्यांचे संदर्भाधिन क्र.३ च्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच, यापुर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक १.९.२०२० ते दिनांक २८.२.२०२१ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत.

सदर मुदतवाढ महसूल व वन विभागाने निश्चित केलेल्या आकृतीबंधात या पदांचा समावेश आहे या अटीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

उक्त परिस्थितीत "वनसंरक्षण सर्वसाधारण संरक्षण" या योजनेतर योजनेखालील या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र "अ" येथील एकूण ७९ अस्थायी पदास दिनांक १.९.२०२० ते दिनांक २८.२.२०२१ पर्यत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

सदरहू पदावर होणारा खर्च हा खाली नमुद केलेल्या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा व त्याखालील सन २०२०-२०२१ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

| | | |
|---|---|---|
| प्रधान शीर्ष | - | २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर) |
| उपप्रधान शीर्ष | - | ०१ वनीकरण |
| गौण शीर्ष | - | १०१ वनसंधारण विकास व पुनर्निर्मिती |
| उप गौण शीर्ष | - | (०३) अग्नीपासून वनांचे संरक्षण |
| | | (०३) (०१) अग्नीपासून वनांचे संरक्षण (२४०६ ०१३१) |

हा शासन निर्णय वित्त विभाग, क्र.पदनि २०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क.,दिनांक ३१.८.२०२० अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००९३०१७२०२०७११९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GAJENDRA PRAKASH NARWANE

Digitally signed by GAJENDRA PRAKASH NARWANE
DN: CN = GAJENDRA PRAKASH NARWANE, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = REVENUE AND FOREST DEPARTMENT
Date: 2020.09.30 17:22:23 +05'30'

**(गजेंद्र नरवणे)**
**उप सचिव (वने),**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संरक्षण), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, वन्यजीव (पश्चिम बोरीवली), मुंबई.
५) मुख्य वनसंरक्षक (प्रा.),नागपूर, चंद्रपूर, गडचिरोली, अमरावती, यवतमाळ, ठाणे, नाशिक, कोल्हापूर, धुळे, औरंगाबाद.
६) मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती.
७) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१०) वित्त विभाग, व्यय-१०/ अर्थ-६, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
११) वित्त विभाग, वित्तिय सुधारणा-१, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१२) ब-१/फ-२/फ-४ कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३) कार्यासन फ-६, महसूल व वन विभाग (निवडनस्ती), मंत्रालय, मुंबई-३२.

## शासन निर्णय क्रमांक :- टिआरएस- ०२/२०२०/प्र.क.४५/फ-६,

## दिनांक ३० सप्टेंबर, २०२० सोबतचे विवरणपत्र "अ"

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | वनरक्षक | ५८ |
| २ | सशस्त्र पोलीस शिपाई | १ |
| ३ | वाहनचालक | ५ |
| ४ | बिनतारी यंत्रचालक | ६ |
| ५ | बिनतारी यंत्रचालक वनपाल | ९ |
| | **एकूण** | **७९** |

GAJENDRA PRAKASH NARWANE

Digitally signed by GAJENDRA PRAKASH NARWANE
DN: CN = GAJENDRA PRAKASH NARWANE, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = REVENUE AND FOREST DEPARTMENT
Date: 2020.09.30 17:22:56 +05'30'

(गजेंद्र नरवणे)
उप सचिव (वने),
महसूल व वन विभाग